जिल्हाधिकारी, मुंबई शहर कार्यालयातील प्रलंबित पाणी व वीज देयके अदा करण्यास मंजुरी देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

शासन निर्णय क्रमांक: पूरक-२०१६/प्र.क्र. १६२/ई-८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १८/०३/२०१७.

संदर्भ:- १) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई कार्यालयाचे पत्र क्र. लेखामेळ/आरसीएन-१/२०५३/प्रशा.मान्यता/अनु.मागणी/२०१६/२६४, दि.०८/०८/२०१६

२) जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचे पत्र क्र. लेखा/वि.पा.थ.दे./प्र. मा./२०१६/२५५०, दि. २५/१०/२०१६.

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.पूरक-२०१७/प्र. क्र. ५१/ब-१, दि.०५/०१/२०१७.

**प्रस्तावना:-**

विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांनी संदर्भाधीन दिनांक ०८/०८/२०१६ रोजीच्या पत्रान्वये जिल्हाधिकारी, मुंबई शहर कार्यालयातील माहे मे, २०१२ पासून माहे जुलै, २०१५ पर्यंतची प्रलंबित वीज देयके तसेच माहे, मे २०१२ ते डिसेंबर, २०१५ पर्यंतची पाणी मीटरची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी रु. ८२,५६,६९५/- च्या खर्चास मंजुरी देण्याचा सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

जिल्हाधिकारी, मुंबई शहर कार्यालयातील खालील विवरणपत्रातील एक वर्षाहून अधिक कालावधीपासून प्रलंबित असलेली पाणी मीटर व वीज मीटरची रु. ८२,५६,६९५/- ची (रुपये ब्याऐंशी लाख छपन्न हजार सहाशे पंच्याण्णव फक्त) देयके अदा करण्यास शासन मंजुरी देत आहे.

| अ. क्र. | विद्युत व पाणी मीटर क्र. | देयकांचा कालावधी | देयकांची रक्कम (रु.) |
|---|---|---|---|
| १. | विद्युत मीटर क्र. P ०८०१४० (P११५७८२) | माहे मे, २०१२ ते जुलै, २०१५ | ३८,२६,९४५/- |
| २. | पाणी मीटर क्र. - AXX ३२९०००५ | माहे ऑक्टोबर, २०१३ ते डिसेंबर, २०१५ | ११,५१,४६७/- |
| ३. | पाणी मीटर क्र. - AXX ३३००००० | माहे मे, २०१२ ते डिसेंबर, २०१५ | २६,७५,०७७/- |
| ४. | पाणी मीटर क्र. - AXX ३३१०००४ | माहे ऑक्टोबर, २०१३ ते डिसेंबर, २०१५ | ६,०३,२०६/- |
| | **एकूण** | | **८२,५६,६९५/-** |

२. सदर खर्च "मागणी क्र. सी-१, २०५३ जिल्हा प्रशासन (००)०९३ जिल्हा आस्थापना (०१) सर्व साधारण आस्थापना (०१) (०१) आयुक्त कोकण (२०५३ ००२८) ०६- दुरध्वनी, वीज व पाणी शुल्क" या लेखाशिर्षाखालील चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर पुरक अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-विअप्र-२०१३/प्र.क्र.-३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियमावली, १९७८ मधील भाग- पहिला, उप विभाग-एक मधील अ.क्र.६ नियम क्र. ४० अनुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०३१८१११९१९६३१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sambhaji C Mondkar

Digitally signed by Sambhaji C Mondkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=498986dde0d282daba86b0acfc9c21d4f9594cc3a6d64857d6a53c9b86d5509b, cn=Sambhaji C Mondkar
Date: 2017.03.18 11:33:33 +05'30'

(सं. चं. मोंडकर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२) जिल्हाधिकारी, मुंबई शहर.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र , मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) उप सचिव, (कार्यासन व्यय-९/अर्थ-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) सह सचिव (कार्यासन ब-१) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.